दिनांक २५.४.९६ अन्वये त्या विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

अ.वि.कादरिकर

[ अ. वि. कादरिकर ]

उप सचिव,

ग्राम विकास व जलसंधारण विभाग

प्रत :-

१] लेखा अधिकारी, संगणक शाखा, संचालनालय, लेखा व कोषागरे, मुंबई, नवि प्रशासन भवन, ५ वा मजला मंत्रालया समोर यांना त्यांचे अनौपचारिक संदर्भ क्र. तांत्रिक/संगणक १२९६/कक्ष-५/अनौ. सं. क्र. १८/१६, दि. १५.५.९६ च्या संदर्भात माहितीस्तव अग्रेषित.

२] मा. राज्यपालांचे सचिव,

३] मा. मुख्य मंत्र्यांचे खाजगी सचिव.

४] सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.

५] मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,

६] अतिरिक्त मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,

७] शासनाचे सर्व सचिव,

८] सर्व विभागीय आयुक्त.

९] सर्व जिल्हाधिकारी,

१०] उप सचिव महाराष्ट्र विधीमंडळ विभाग [ जरोयो समिती ]

११] संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ,

१२] संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.

१३] आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.

१४] अतिरिक्त संचालक, प्रकल्प बांधणी आणि ग्राविका, मंत्रालय, मुंबई.

१५] संचालक, आदिवासी विकास, नाशिक,

१६] महालेखापाल, महाराष्ट्र राज्य-१, मुंबई.

१७] महालेखापाल, महाराष्ट्र राज्य-२, नागपूर.

१८] सर्व अधिकारी, ग्राम विकास व जलसंधारण विभाग.

१९] सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.

२०] सर्व प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा,

२१] सर्व गट विकास अधिकारी, पंचायत समिती.

२२] कार्यासन र-१२, महसूल व वन विभाग.

२३] कार्यासन क्र. ६-क, ग्राम विकास व जलसंधारण विभाग.

२४] मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्र विकास प्राधिकरण [हडको सेल], गृहनिर्माण भवन, वांद्रा [पूर्व] मुंबई.

निवड नस्ती, जल-१७

२५] वित्त विभाग-अर्थसंकल्प-१६.